**Automated Multi-Modal Biometric Identification System (AMBIS) संगणकीय यंत्रणेमध्ये Workflow Simplification करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक पीईक्यु ०२२५/प्र.क्र.१८५/पोल-४,**
मंत्रालय, मुंबई - ४०००३२,
दिनांक :- २१ मे, २०२५

**संदर्भ :** १) शासन निर्णय, गृह विभाग क्र.एफपीबी-०७१६/प्र.क्र.५५०/पोल-४, दि.११.११.२०१६,
२) शासन पत्र, गृह विभाग क्र.एफपीबी-०७१६/प्र.क्र.५५०/पोल-४, दि.२४.०३.२०१७,
३) अपर पोलीस महासंचालक, गुन्हे अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. ३६६९/अंमुके/गुअवि/AMBIS/२०२४ , दि.१७.१२.२०२४.
४) अपर पोलीस महासंचालक (नि. व सं.), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/१७/६१६२/ AMBIS प्रकल्प/९५/२०२२, दि.०२.०१.२०२५ व दि.२९.०४.२०२५
५) उच्चस्तरीय शक्ती प्रदान समितीच्या दि. १३.०२.२०२५ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र पोलीस दलासाठी AMBIS (Automated Multi-Modal Biometric Identification System) ही नविन प्रणाली खरेदी करण्यास शासन मान्यता देण्यात आलेली आहे. सदर प्रकल्पामध्ये Chance Print Verification करण्याच्या स्तरांमध्ये (Levels) केंद्र सरकारच्या NAFIS संगणकीय यंत्रणेच्या स्तरांप्रमाणे बदल करणे गरजेचे आहे. त्याअनुषंगाने AMBIS यंत्रणेच्या Workflow मध्ये बदल करण्याबाबत Workflow simplification या प्रस्तावावर दिनांक १३/०२/२०२५ रोजीच्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या बैठकीत चर्चा करण्यात येवून त्यास मंजूरी देण्यात आली आहे. त्यानुसार AMBIS यंत्रणेमध्ये Workflow simplification करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

AMBIS (Automated Multi-Modal Biometric Identification System) यंत्रणेच्या Workflow मधील स्तरांमध्ये केंद्र सरकारच्या NAFIS यंत्रणेशी सुसंगत बदल करण्याच्या अनुषंगाने, Chance Print Verification चे Levels कमी करण्यास व त्यासाठी खालील तपशिलानुसार येणाऱ्या रु. २,४७,९७,६२०/- (अक्षरी रुपये दोन कोटी सत्तेचाळीस लक्ष सत्याण्णव हजार सहाशे वीस फक्त) (G.S.T.सह) आणि साईट भेटीचा खर्च रु. ३७,२८८/- (अक्षरी रुपये सदतीस हजार दोनशे अठ्ठयाऐंशी फक्त) (G.S.T.सह) इतक्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

| Quotes for the Upgrade | | | |
|---|---|---|---|
| Sr. | Item | Description | Total Price with Taxes ( in INR) |
| 1 | Workflows | a. Simplification of number of approval levels<br>b. Simplification of Quality Check | **2,47,97,620** |
| **Optional Cost** | | | |
| Sr. | Item | Description | Total Price with Taxes ( in INR) |
| 2 | per site Visitation | Flat rate if no remediation | **37,288** |
| This Optional cost will be applicable on per site basis if site visit is required for deploying the upgrade including travels and out of pocket expenses | | | |

**२.** सदरचा खर्च गृह विभाग "मागणी क्र.बी-१,२०५५ पोलीस (००) ११५ पोलीस दल आधुनिकीकरण (०१) तंत्रज्ञान विकास प्रकल्प (०१) (०१) तंत्रज्ञान विकास प्रकल्प (२०५५A०३२) ५२-यंत्रसामुग्री व साधनसामुग्री" या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**३.** सदर प्रकरणी अपर पोलीस महासंचालक, गुन्हे अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून आणि त्यांच्या अधिनस्त कार्यालय अधिक्षक यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, दि.१७.०४.२०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका -१९७८,भाग- पहिला, उप विभाग-तीन,अ.क्र.४ नियम क्र.२७ (२) अन्वये प्रशासनिक विभागास असलेल्या पूर्ण प्राधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०५२११८००२१३८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by ARCHANA VILAS WALZADE
Date: 2025.05.21 18:01:50 +05'30'

**(अर्चना वालझाडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), मुंबई
३. अपर पोलीस महासंचालक, गुन्हे अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. अपर पोलीस महासंचालक (नि.व सं.), महाराष्ट्र राज्य पोलीस मुख्यालय, मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी/ निवासी लेखा अधिकारी, मुंबई
६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
७. कक्ष अधिकारी (अर्थसं-१),गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती, गृह विभाग/ पोल-४,मंत्रालय, मुंबई.